राज्य सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांनी तसेच
राज्य शासनाच्या अखत्यारीतील इतर
संस्थांनी कर्जरोखेद्वारा उभारावयाचा निधी
शक्ती प्रदान समितीची स्थापना

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र.शसाउ-1098/प्र.क्र.5/98/सा.उ.**
**मंत्रालय, मुंबई-400 032**

**दिनांक: 17 जुलै 1998**

वाचा: शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
क्रमांक: पापुयो-1197/160/पोपु-4, दिनांक 3-12-1997.

प्रस्तावना :- राज्यातील विकास कार्यक्रमासाठी आणि प्रामुख्याने मुलभूत सुविधा क्षेत्रात आवश्यक असणा-या भांडवली खर्चासाठी राज्य शासनाच्या सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम आणि इतर संस्था भांडवली बाजारातून कर्जरोखे वितरणाद्वारे निधी उभारीत असून असा निधी उभारण्यास शासन हमी देखील संजूर करण्यात येत आहे. भांडवली बाजारातून कर्जरोखेद्वारे उभारण्यात यावयाच्या निधीसंदर्भात राज्य शासनाच्या भविष्यातील दायित्वाचा विचार करता, सदर निधी उभारणीसंदर्भात एखादी प्रभावी यंत्रणा निर्माण करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

प्रस्तावनेत नमूद केलेली पार्श्वभूमी लक्षात घेता राज्य शासनाच्या सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांनी तसेच इतर संस्थांनी भांडवली बाजारातून कर्जरोखेद्वारे उभारण्याच्या प्रक्रियेमध्ये वेळोवेळी उद्भवणा-या बाबींवर जलद गतीने निर्णय घेण्यासाठी शासन खालीलप्रमाणे शक्ती प्रदान समिती गठीत करण्याचा निर्णय घेत आहे.

| | | |
|---|---|---|
| (1) | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| (2) | प्रधान सचिव (नियोजन) | सदस्य |
| (3) | अपर मुख्य सचिव (पाणीपुरवठा व स्वच्छता) | सदस्य |
| (4) | सचिव (ऊर्जा) | सदस्य |
| (5) | प्रधान सचिव (वित्त) | सदस्य |
| (6) | सचिव (उद्योग) | सदस्य |
| (7) | सदस्य सचिव (प्रशासन आणि अर्थ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | सदस्य |
| (8) | प्रधान सचिव (व्यय) वित्त विभाग, | सदस्य |
| (9) | सह सचिव (सार्वजनिक उपक्रम) वित्त विभाग. | सचिव |



कृ.मा.प..

2. सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांना तसेच इतर संस्थांना भांडवली बाजारातून कर्जरोखे वितरणाद्वारे उभारावयाच्या प्रस्तावासंदर्भात प्रत्येक प्रस्ताव प्रथम शक्ती प्रदान समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावा. सदर समिती रोखे वितरण प्रक्रियेमध्ये नेमण्यात यावयाच्या को ऑर्डीनेटींग लिड अॅरेंजर्स आणि लिड मॅनेजर्स यांच्या नेमणुकीबाबतील निर्णय घेईल. सदर कर्जरोखे वितरणासंदर्भातील मर्चंट बॅंकर्स यांच्या नेमणुका तसेच उभारण्यात यावयाच्या निधीच्या रकमेची कमाल मर्यादा, कर्जरोखे वितरण करण्याचा विवक्षित कालावधी, कर्जरोखे वितरणाद्वारे उभारण्यात यावयाच्या कर्जरोख्यांवरील व्याज दर, कर्जरोख्यांची रचना इत्यादी सर्व निर्णय सदर शक्ती प्रदान समिती घेईल.

3. ज्या सार्वजनिक उपक्रमांकडून कर्जरोखे वितरणाद्वारे निधी उभारण्यात येणार असेल त्या उपक्रमाशी संबंधित असलेल्या प्रशासकीय विभागाचे सचिव आणि संबंधित उपक्रमाचे व्यवस्थापकीय संचालक/मुख्य अधिकारी यांना उच्चाधिकार समिती बैठकीस आमंत्रित करेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

र.शे. कामत

(र.शे.कामत )
कार्यासन अधिकारी
वित्त विभाग.

प्रति,

1. मा.राज्यपालांचे सचिव
2. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव
3. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
4. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
5. अतिरिक्त मुख्य सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
6. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
7. सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
8. सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
9. सदस्य सचिव (प्रशासन आणि अर्थ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, चौथा मजला, नरीमन पॉईन्ट, मुंबई
10. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव
11. सर्व मंत्र्यांचे /राज्य मंत्र्यांचे खाजगी सचिव
12. राज्य शासनाचे सर्व सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम
13. सर्व मंत्रालयीन विभाग,
14. वित्त विभागातील सर्व कार्यासन अधिकारी
15. निवडनस्ती सार्वजनिक उपक्रम, वित्त विभाग.

पुम -541 (500-7-98)-13...